सन २०२२-२३ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय अनुदाने .
मागणी क्र.एल-२,"२०५३ ,जिल्हा प्रशासन-०९३ जिल्हा
आस्थापना (०६) (०१) पंच,सरपंच, सचिव,अशासकीय सदस्य
इत्यादींना प्रशिक्षण - राज्यक्षेत्र,३१- सहाय्यक अनुदान (वेतनेतर),
३६-सहायक अनुदान (वेतन) (लेखाशीर्ष क्र.२०५३०५७४)
(योजनेत्तर) (दत्तमत) ( तिसरा हप्ता )

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः अनुग्रा -२०२२/प्र.क्र.१४/आस्था-१५
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१
दिनांक : १७ मे, २०२२.

वाचा -

१.शासन निर्णय क्रमांक- ग्राम विकास व जलसंधारण विभाग-प्रशिक्षण-२०९३/प्र.क्र.८४५/०९, दि. १७.०९.१९९३
२.शासन परिपत्रक क्रमांक-ग्राम विकास व जलसंधारण विभाग-प्रशिक्षण ११९९/प्र.क्र.५८१/६१, दि.२३.९.१९९८.
३. शासन परिपत्रक क्रमांक-ग्राम विकास व जलसंधारण विभाग -प्रशिक्षण-२०००/ प्र.क्र.८५९/४४, दि.१२.६.२००१.
४. शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४.०४.२०२२.
५. शासन निर्णय क्रमांकः अनुग्रा -२०२२/प्र.क्र.१४/आस्था-१५, दिनांक ०६.०४.२०२२.
६. शासन निर्णय क्रमांकः अनुग्रा -२०२२/प्र.क्र.१४/आस्था-१५, दिनांक २०.०४.२०२२.

प्रस्तावना -

सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरिता मागणी क्र . एल-२, “२०५३, जिल्हा प्रशासन-०९३ जिल्हा आस्थापना (०६) (०१) पंच, सरपंच, सचिव, अशासकीय सदस्य इत्यादींना प्रशिक्षण- राज्यक्षेत्र, ३१- सहायक अनुदान (वेतनेतर), ३६-सहायक अनुदान (वेतन) (सांकेतांक क्र. २०५३०५७४) (योजनेत्तर) (दत्तमत) अंतर्गत ११ पंचायत राज प्रशिक्षण केंद्रे यांना वेतनेतरसाठी रु . ३६४३.०० हजार (रुपये छत्तीस लक्ष त्रेचाळीस हजार फक्त) व वेतनासाठी रु. ३५१११.०० हजार (रुपये तीन कोटी एक्कावन्न लक्ष अकरा हजार फक्त) असे एकूण रु.३८७५४.०० हजार (रुपये तीन कोटी सत्याऐंशी लक्ष चोपन्न हजार फक्त) इतकी तरतुद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे . सदर अर्थसंकल्पित अनुदानापैकी तिसरा हप्ता वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

११ पंचायत राज प्रशिक्षण केंद्रांसाठी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षासाठी ३६ सहायक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टाकरिता अर्थसंकल्पिय तरतुदीच्या १० % मर्यादेत रु. ३५११.०० हजार (रुपये पस्तीस लक्ष अकरा हजार फक्त) इतके अनुदान संदर्भ क्रमांक ५ अन्वये पहिला हप्ता म्हणून उपलब्ध करुन दिले होते. तद्नंतर वित्त विभागाने अर्थसंकल्पिय तरतुदीच्या ५ % मर्यादेत उपलब्ध करुन दिलेले रु. १७५५.६५० हजार (रुपये सतरा लक्ष पंचावन्न हजार सहाशे पन्नास फक्त ) इतके अनुदान संदर्भ क्रमांक ६ अन्वये दुसरा हप्ता म्हणून वितरित करण्यात आला आहे.

२. आता वित्त विभागाने अर्थसंकल्पिय तरतुदीच्या मर्यादेत ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) करिता १४ % व ३६ सहायक अनुदाने (वेतन) करिता १०% इतके अनुदान उपलब्ध करुन दिले आहे. ११ पंचायत राज प्रशिक्षण केंद्रे यांना सन २०२२-२३ या अर्थसंकल्पिय तरतुदीच्या मर्यादेत ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) करिता १४ % प्रमाणे रु.५१०.०२० हजार ( रुपये पाच लक्ष दहा हजार वीस फक्त ) व ३६ सहायक अनुदाने (वेतन) करिता १०% प्रमाणे रु. ३५११.१०० हजार ( रुपये पस्तीस लक्ष अकरा हजार शंभर फक्त ) असा एकूण रु.४०२१.१२ हजार (रुपये चाळीस लक्ष एकवीस हजार एकशेवीस फक्त) इतका निधी सोबत जोडलेल्या परिशिष्टातील तपशिलानुसार तिसरा हप्ता म्हणून वितरित करण्यात येत आहे.

३. प्रशिक्षण केंद्राना अनुदान द्यावयाच्या कार्यपध्दतीबाबत शासन परिपत्रक क्रमांक प्रशिक्षण - ११९८/प्र.क्र.५८१/६१ दि.२३ सप्टेंबर, १९९८ व शासन परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण २०००/प्र.क्र.८५९/४४, दि.१२ जून २००१ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांच्या अनुंषगाने सर्व संबंधित उपायुक्त (आस्था) यांनी सदर पंचायत राज प्रशिक्षण केंद्रास दरमहा अनुदान अदा करण्याबाबत त्वरीत कार्यवाही करावी. तसेच संदर्भात दर्शविलेल्या शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक १२ मधील अटीनुसार केंद्रानी खर्च करावा.

४. सदर निधी वितरणाकरिता तसेच निधी ज्या बाबींकरीता मंजूर करण्यात आला आहे , त्याच बाबींवर खर्च करण्यात येईल याची काटेकोर अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित उपायुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय यांची असेल. तसेच सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्रही तात्काळ सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

५. हा खर्च " मागणी क्र.एल-२, २०५३, जिल्हा प्रशासन-०९३ जिल्हा आस्थापना (०६) (०१) पंच,सरपंच, सचिव, अशासकीय सदस्य इत्यादींना प्रशिक्षण- राज्यक्षेत्र, ३६-सहाय्यक अनुदान (वेतन) (संकेतांक क्र. २०५३ ०५७४) (योजनेत्तर) (दत्तमत)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून तो या लेखाशीर्षांतर्गत केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा तसेच सदर खर्च त्याच लेखाशिर्षाखाली खर्च पडतो आहे , याबाबत ताळमेळ घालून खातरजमा करावी व विभागीय आयुक्तांनी दरमहा शासनास कळवावे. सदर लेखाशिर्षाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून संबधित विभागीय आयुक्त कार्यालयातील उपायुक्त (आस्थापना) हे काम पाहतील.

६. विभागीय आयुक्त कार्यालयाने प्रशिक्षण केंद्रास अनुदान वितरीत करताना वेतन बाबीवर प्रत्यक्ष किती अनुदानाची आवश्यकता आहे याची खातरजमा करुन त्यांना आवश्यक तेवढी रक्कम उपलब्ध करुन द्यावी . उपरोक्त नमूद केलेल्या अनुदानापेक्षा जास्त अनुदान वितरीत केले जाणार नाही याची दक्षता घ्यावी . तसेच प्रशिक्षण केंद्राने वेतनाकरिता दरमहा किती अनुदान आवश्यक आहे याची पूर्वसूचना संबंधित आयुक्त कार्यालयास द्यावी.त्याप्रमाणे आयुक्त कार्यालयाने वेतनाकरिता अनुदान वितरीत करावे. आवश्यक असलेल्या अनुदानाबाबत पूर्वसूचना न दिल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित केंद्राच्या प्राचार्यांची असेल.

७. या अनुदानातून संबंधित प्रशिक्षण केंद्राने केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचा अधिकार महालेखापाल, (लेखा) महाराष्ट्र-१ मुंबई आणि/किंवा महालेखापाल (लेखा) महाराष्ट्र-२ नागपूर यांना राहील व त्यांना त्यांचे हे काम योग्य तऱ्हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित प्रशिक्षण केंद्र / संस्था, मदत / सुविधा पुरवतील.

८. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग १ ला, उपविभाग १ ते ५ मधील तरतूदीनुसार शासन निर्णय दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या उप विभाग - ३ मधील अ.क्र. ४ परि. २७ (२) नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२२०५२०१३०७५६६३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने ,

P.D. Deshmukh
Digitally signed by P.D. Deshmukh
DN: cn=P.D. Deshmukh, o=Rural Development Department, ou, email=popat.deshmukh@nic.in, c=IN
Date: 2022.05.23 13:15:28 +05'30'

( पो.द.देशमुख )
उप सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रत

१. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड, पुणे.
२. विभागीय आयुक्त, सर्व (प्रत्येकी २ प्रती)
३. संचालक राज्य ग्रामीण विकास संस्था (यशदा), बाणेर रोड, पुणे
४. उप आयुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण, पुणे,औरंगाबाद,नागपूर, अमरावती व नाशिक.
५. जिल्हा कोषागार अधिकारी,कोकण, पुणे,औरंगाबाद,नागपूर ,अमरावती व नाशिक.
६. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र - १, मुंबई.
७. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र - २, नागपूर.
८. वित्त विभाग , कार्यासन क्र. अर्थ-१७/व्यय-१५
९. प्राचार्य, पंचायत राज प्रशिक्षण केंद्र, (सर्व) .
१०. कार्यासन क्र. वित्त-१, वित्त-६, वित्त-७ ग्राम विकास विभाग (२ जादा प्रतींसह)
११.निवड नस्ती का.क्र. आस्था-१५, ग्राम विकास विभाग .

## परिशिष्ट

| शासन निर्णय क्र.अनुग्रा २०२२/प्र.क्र.१४ /आस्था-१५,दि. १७ मे, २०२२ | | | |
|---|---|---|---|
| सन २०२२-२३ या कालावधीतील तिसऱ्या हप्त्याचे वितरण (रु.हजारात) | | | |
| अ.क्र. | पंचायत राज प्रशिक्षण केंद्राचे नाव | वेतनेतर | वेतन |
| १ | कोसबाड हिल, जि.पालघर | २२.०० | १००.०० |
| **अ)** | **विभागीय आयुक्त, कोकण** | **२२.००** | **१००.००** |
| २ | वर्ये, जि.सातारा | ६०.०२ | २५८.०० |
| ३ | गारगोटी, जि.कोल्हापूर | ६२.०० | ३८६.०० |
| ४ | गौडगांव, जि.सोलापूर | ३२.०० | ६५.१० |
| **ब)** | **विभागीय आयुक्त, पुणे** | **१५४.०२** | **७०९.१०** |
| ५ | मुरुड, जि.लातूर | १०.०० | ३५१.०० |
| **क)** | **विभागीय आयुक्त, औरंगाबाद** | **१०.००** | **३५१.००** |
| ६ | हनुमान नगर, जि.नागपूर | ६८.०० | १५७.०० |
| ७ | मूल, जिल्हा चंद्रपूर | ५५.०० | ५७४.०० |
| **ड)** | **विभागीय आयुक्त, नागपूर** | **१२३.००** | **७३१.००** |
| ८ | खिरोदा, जि.जळगाव | १०.०० | १४५.०० |
| **इ)** | **विभागीय आयुक्त, नाशिक** | **१०.००** | **१४५.००** |
| ९ | खामगांव, जि.बुलढाणा | ११३.०० | ६५७.०० |
| १० | शिवाजीनगर, जि.अमरावती | ४६.०० | ४७४.०० |
| ११ | पुसद, जि.यवतमाळ | ३२.०० | ३४४.०० |
| **ई)** | **विभागीय आयुक्त, अमरावती** | **१९१.००** | **१४७५.००** |
| | अ)+ब)+क)+ड)+इ)+ई) | **५१०.०२०** | **३५११.१००** |

P.D. Deshmukh

Digitally signed by P.D. Deshmukh
DN: cn=P.D. Deshmukh, o=Rural Development Department, ou, email=popat.deshmukh@nic.in, c=IN
Date: 2022.05.23 13:17:36 +05'30'

( पो.द.देशमुख )
उप सचिव, महाराष्ट्र शासन .